GR 20040721134024001-0300

**चुकविलेल्या मुद्रांक शुल्काचा शोध घेण्याकरिता माहिती देणा-यास "बक्षिस योजना" राबविण्याबाबत**

महाराष्ट्र शासन,
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय- मुद्रांक २००१/३०७/ प्र.क्र.१६०/ म-१.
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २८/६/०४

**शासन निर्णय :-**

मुद्रांक व नोंदणी विभाग हा शासनास मोठ्या प्रमाणावर महसूली उत्पन्न मिळवून देणारा विभाग असून महसूली उत्पन्न मिळवून देण्यात या विभागाचा राज्यात दुसरा क्रमांक आहे. या विभागातर्फे मुद्रांक शुल्क व नोंदणी फी द्वारे शासनास प्रतिवर्षी सुमारे ३०००/- कोटी रुपया पेक्षा जास्त महसूली उत्पन्न मिळते. हे उत्पन्न सर्वसाधारण नोंदणी अधिका-यापुढे नोंदणीसाठी अथवा इतर प्रकारे कामकाजासाठी पुढे आलेल्या दस्तऐवजामधून मिळते.

२. नागरी व प्रभाव क्षेत्रामध्ये स्थावर मालमत्तेच्या किंमती मोठ्या प्रमाणावर वाढत आहेत. त्यामुळे मुद्रांक शुल्क चुकवण्याकडे संबंधितांचा कल दिसून येतो. ही बाब ग्रामीण भागात जरी दिसून येत नसली तरी शहरी भागात प्रभाव क्षेत्रात व जेथे बिनशेती क्षमता (N.A.Potentials) असलेल्या क्षेत्र मध्ये मोठ्या प्रमाणात आढळून येते. अशा सर्व मुद्रांक शुल्क चुकविलेल्या प्रकरणांचा मोठ्या प्रमाणांवर शोध घेणे अनिवार्य झाले आहे.

३. मुंबई मुद्रांक अधिनियम १९५८ चे परिशिष्ट १ मध्ये ६२ अनुच्छेद आहेत. यापैकी ज्या दस्तांची नोंदणी भारतीय नोंदणी अधिनियम १९०८ चे कलम १७ नुसार अनिवार्य आहे. ते दस्त नोंदणीस दाखल केले जातात व त्यावेळी दुय्यम निबंधक त्या दस्तास मुद्रांक शुल्क यथोचितरित्या दिले आहे की नाही याची पडताळणी करुन आवश्यकते प्रमाणे चुकविलेला मुद्रांक शुल्क वसुल करु शकतात. मात्र काही वेळा केवळ गुंतवणुकीच्या उद्देशाने व्यवहार केला असेल तर त्या दस्ताची नोंदणी न करणे व नियमानुसार मुद्रांक शुल्क न भरणे याकडे पक्षकारांचा कल असतो. नोंदणी अधिनियम १९०८ चे कलम १७ अन्वये ज्या दस्तऐवजांची नोंदणी सक्तीची नाही व ती वैकल्पिक आहे अशा अनेक दस्तऐवजांमध्ये आवश्यक व देय असलेले मुद्रांक शुल्क भरले जात नाही व असे दस्तऐवज केवळ रुपये १०/- चे मुद्रांकावर निष्पादित केले जातात व अशा दस्तऐवजात महसूल बुडविला जातो. या प्रकारे चुकविलेल्या मुद्रांक शुल्काचा शोध घेण्यासाठी सध्या खालीलप्रमाणे यंत्रणा कार्यरत आहे.

(१) मुंबई येथील मुद्रांक अधिक्षक कार्यालयामार्फत मुंबई शहरातील स्टॉक एक्सचेंज, बँका, विमा कंपन्या व इतर ठिकाणी निष्पादित केल्या जाणा-या दस्तऐवजांचा शोध घेतला जातो. मात्र मुंबई शहर देशाची औद्योगिक राजधानी असल्याने या ठिकाणी होणा-या उलाढालीचे प्रमाण दिवसेंदिवस वाढत चाललेले आहे. व्यवहाराचे स्वरुप दिवसेंदिवस क्लिष्ट होत असून त्याची संख्या वाढत आहे. मुद्रांक अधिक्षक कार्यालयास मुंबई विभागातील मुद्रांक विक्री व पुरवठ्याच्या कामाचे नियंत्रण करावे लागते, त्याशिवाय अभिनिर्णय, परतावा इत्यादी ग्राहकांशी संबंधित दैनंदिन कामे पार पाडावी लागतात. त्यामुळे चुकविलेल्या मुद्रांक शुल्काचा पूर्णपणे शोध व वसुलीसाठी मुद्रांक अधिक्षक यांची यंत्रणा पर्याप्त ठरत नाही.

(२) राज्यातील चुकविलेल्या मुद्रांक शुल्काचा शोध व वसुली या कामासाठी नोंदणी उपमहानिरिक्षक (अंमलबजावणी) यांचे कार्यालय कार्यरत आहे. मात्र संपूर्ण राज्यात बदलत चाललेल्या वाणिज्यिक व व्यावसायिक संकल्पनोमुळे या कार्यालयामार्फत शोध व वसुलीच्या कामगिरीवर मर्यादा येत आहे.

(३) जिल्हयाचे मुद्रांक जिल्हाधिकारी यांच्या जिल्हयात चुकविलेल्या मुद्रांक शुल्काचा शोध व वसुली करण्याचे काम करतात. मुद्रांक जिल्हाधिकारी यांना सह जिल्हा निबंधक म्हणून देखील काम पहावे लागते. अधिनस्त दुय्यम निबंधकाच्या कामकाजावर नियंत्रण, प्रशासकीय कामकाज व अभिनिर्णय, परतावा इत्यादी जनतेशी संबंधीत कामे असल्यामुळे मुद्रांक जिल्हाधिकारी यांचेकडून चुकविलेल्या मुद्रांक शुल्काचे काम पूर्ण वेळ होणे दुरापास्त होते. सध्या वाढत्या औद्योगिकरणामुळे व नागरीकरणामुळे व्यवहारांचे स्वरुप क्लिष्ट झाले आहे. वाढत्या स्पर्धेमुळे

व्यवसायिकांचा कल हा उत्पादन खर्चात जास्तीत जास्त बचत करण्याचा दिसून येतो. त्यामुळे विकसन करारनामे, टी.डी.आर. चे दस्त ऐवज, दुकान खरेदीचे करारनामे या सारख्या दस्तऐवजांचे मुद्रांक शुल्क शक्यतो वाचविण्याचा प्रयत्न करण्यात येतो. अशा दस्तऐवजांचे मुद्रांक शुल्क यथोचितरित्या वसुल करण्यासाठी मुद्रांक विभागातर्फे सातत्याने प्रतिबंधात्मक उपाय योजना केल्या जातात. त्याचप्रमाणे शासनाच्या ज्या यंत्रणेचा या दस्तांशी संबंध येतो, त्या सर्व यंत्रणांना मुद्रांक अधिनियमातील तरतुदींची माहिती देऊन कमी मुद्रांकावर निष्पादित झालेल्या दस्तांच्या आधारे कार्यवाही करु नये, अशा सूचना देण्यात आलेल्या आहेत. तरी देखील मुद्रांक शुल्क कमी भरण्याचे प्रमाण दिसून येते. या सर्व कारणामुळे मुद्रांक जिल्हाधिकारी प्रत्येक दस्तापर्यंत पोहोचू शकत नाही. नोंदणीस दाखल न होणा-या दस्तांचे प्रमाण मोठ्या प्रमाणावर असल्याने व मुंबई खेरीज इतर ठिकाणी चुकविलेल्या मुद्रांक शुल्काचा शोध घेण्यासाठी स्वतंत्र यंत्रणा नसल्याने सध्याची यंत्रणा अपुरी पडत आहे. कर वसुलीसाठी इतर विभागात सुसज्य, स्वतंत्र शोध यंत्रणा आहेत. आयकर विभाग, विक्रीकर विभाग ,महानगरपालिकेकडील जकात विभाग यांची प्रत्येक वॉर्डात/ प्रभागात स्वतंत्र दक्षता पथके आहेत. त्यामानाने चुकविलेल्या मुद्रांक शुल्काचा शोध घेण्यासाठी स्वतंत्र अशी विशेष यंत्रणा उपलब्ध नाही. त्यामुळे मुद्रांक शुल्क चुकवेगिरीवर पूर्णपणे नियंत्रण ठेवणे शक्य होत नाही. समाजामध्ये होणा-या विविध व्यवहारांची / दस्तांची या ना त्या कारणाने जनतेमध्ये चर्चा होत असते व अशा वेळी जर दस्त निष्पादनामध्ये काही अनियमितता झाली असेल तर काही जागरुक नागरिकांकडून, स्वयंसेवी संस्थांकडून नोंदणी व मुद्रांक विभागास माहिती प्राप्त होते व त्या आधारे प्रकरणामधील चुकविलेल्या मुद्रांक शुल्काची वसुली होऊ शकते. यामुळे चुकविलेल्या मुद्रांक शुल्काच्या शोधाच्या कामामध्ये जनतेचा प्रत्यक्ष सहभाग वाढला तर अशा प्रकारची प्रकरणे जास्त प्रमाणावर उघडकीस येतील व चुकविलेला मुद्रांक शुल्क मोठ्या प्रमाणावर वसुल होईल अशी अपेक्षा आहे.

४. भारत सरकार पासून ते थेट स्थानिक स्वराज्य संस्थेपर्यंत जर शासनास व संस्थेस लाभ होत असेल तर, त्यासाठी बक्षिसी देण्याचे धोरण सर्वत्र आहे. या धोरणाचा अवलंब करुन मुद्रांक व नोंदणी विभागातही चुकविलेल्या मुद्रांक शुल्काचा शोध घेणेसाठी अशा स्वरुपाचे धोरण राबविण्याचा मानस असून कर या स्वरुपात आवश्यक असलेल्या मूळ मुद्रांक शुल्कास कोणताही धक्का न लावता खालीलप्रमाणे बक्षिस योजना जाहीर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बक्षीस योजना | बक्षिसाची रक्कम |
|---|---|---|
| १ | रुपये ५००/- ते रुपये ५०००/- पर्यंत नोंदणी फी + मुद्रांक शुल्क + दंड अशा एकूण वसूल होणा-या रक्कमेवर | ५ टक्के |
| २ | रुपये ५००१ ते रुपये १ लाख पर्यंत नोंदणी फी + मुद्रांक शुल्क + दंड असा एकूण वसूल होणा-या रक्कमेवर | १० टक्के |
| ३ | रुपये १,००,०००/- चे पुढे वसूल होणाऱ्या रकमेवर | १ लाखापर्यंतचे रक्कमेवर रु. १०,०००/- व त्या पुढील रक्कमेवर सरसकट १% दराने जास्तीत जास्त रु.५०,०००/- पर्यंत |

सदर बक्षिस खालील अटींस व शर्तीस अधीन राहून देणेत येईल.

(१) चुकविलेल्या मुद्रांक शुल्काची वसूली प्रत्यक्ष माहिती देणा-या व्यक्तीने दिलेल्या माहितीमुळे झालेली असावी.

(२) मिळालेल्या माहिती संदर्भात माहिती मिळण्यापूर्वीच कुठल्याही प्रकारची शासकीय कार्यवाही (उदा. नोटीस काढणे इत्यादी )सुरु नसावी.

(३) बक्षिस जाहीर करण्याचे व या बाबतीत निर्णय घेण्याचे अधिकार नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य यांना असतील. तथापि, ते सदर अधिकार नोंदणी उपमहानिरिक्षक या संवर्गातील अधिकारी यांना प्रदान करु शकतील.

(४) रक्कम रुपये १०,०००/- पर्यंत बक्षिस मंजूर करण्याचे अधिकार नोंदणी महानिरिक्षक यांना राहतील.

(५) चुकविलेल्या मुद्रांक शुल्क व फीची वसुली झाल्यानंतर बक्षिसाची रक्कम प्रदान करण्यात येईल.

(६) माहिती देणा-या व्यक्तिकडून ठराविक नमुन्यात माहिती भरुन घेतली जाईल.

(७) दि.१५/९/१९९६ नंतर नोंदणी व मुद्रांक विभागाकडे प्राप्त झालेल्या सर्व ठोस अर्जांना ही योजना लागू करण्यात येईल.

५. चुकविलेल्या मुद्रांक शुल्काचा शोध घेण्यासाठी माहिती देणा-यास बक्षिस मंजुरीची कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहील.

(१) माहिती देणा-यांने दिलेल्या माहितीनुसार प्रकरण प्राप्त झाल्यानंतर व वसुलीची कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर वसुली अधिकारी त्याबाबतचा सविस्तर अहवाल नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करेल. या अहवालामध्ये प्राप्त झालेली माहिती व प्रत्यक्षात झालेली वसुली याचा तपशील असेल. तसेच बक्षिस कोणास व किती रुपयाचे मंजूर करावे याबाबत स्पष्ट शिफारस असेल, त्याचप्रमाणे परिशिष्ट १ मध्ये नमूद केलेल्या अर्जाच्या नमुन्यात प्राप्त झालेले मूळ निवेदन तसेच प्रस्तुत माहिती त्यांच्या कार्यालयात या पूर्वी दाखल नव्हती व प्राप्त माहितीमुळेच प्रकरण उघडकीस आले आहे, असे प्रमाणपत्रासह अहवालासोबत पाठविणे आवश्यक राहील.

(२)अधिका-यांच्या शिफारशींची छाननी करुन मुद्रांक नियंत्रक, महसूल प्राधिकारी बक्षिसाची रक्कम मंजूर करतील.

(३) मुद्रांक नियंत्रक महसूल प्राधिकारी यांच्या आदेशानुसार संबंधित मुद्रांक जिल्हाधिकारी सदरची रक्कम कोषागारातून अहरीत करुन धनादेशाद्वारे संबंधित माहिती देणा-यास अदा करण्यात येईल.

६. चुकविलेल्या मुद्रांकाची माहिती देणा-यास देय असलेल्या बक्षिसासाठी होणारा खर्च हा सन २००४-०५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. हे आदेश वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.प्र.क्र.६२६/०३/व्यय-१०, दि.२०/११/२००३ नुसार तसेच अर्धशासकीय पत्र क्र.संकिर्ण-१००४/प्र.क्र.११/अर्थोपाय, दि.१७ मे, २००४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. या अनुषंगाने मुंबई मुद्रांक नियम १९३९ मध्ये आवश्यक ती सुधारणा यथावकाश करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रमाकान्त असमर )
सह सचिव,
महसूल व वन विभाग.

प्रति,

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

प्रतिलिपी-

सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
मुद्रांक अधिक्षक, मुंबई,
संचालक, नगररचना, पुणे,
सह संचालक, मुल्यांकन पुणे,
उपसंचालक, नगर रचना मुल्यांकन, मुंबई,
सर्व विभागीय नोंदणी उपमहानिरिक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,
सहाय्यक संचालक, नगर रचना (मुल्यांकन), मुंबई, ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, कोकण व प्रस्तावित अमरावती व नाशिक
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

महालेखापाल, (लेखा परीक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

सहजिल्हा निबंधक वर्ग-१, कोल्हापूर,सांगली,अमरावती,अकोला,नांदेड,औरंगाबाद,जळगांव, नाशिक, अहमदनगर, ठाणे/पुणे/नागपूर/सोलापूर

सहजिल्हा निबंधक (मुद्रांक व मुल्यांकन) रायगड, रत्नागिरी, जालना, वर्धा, सिंधुदुर्ग, भंडारा, लातूर

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

सर्व सह जिल्हा निबंधक

अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,

नोंदणी उपमहानिरिक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, (अंमलबजावणी), मुंबई.

दुय्यम निबंधक व प्रशासकीय अधिकारी, मुंबई/बांद्रा

उपजिल्हाधिकारी (मुद्रांक व मुल्यांकन) कोल्हापूर/सांगली/अमरावती/अकोला/ नांदेड/ औरंगाबाद/ जळगांव/ अहमदनगर

निवासी लेखाधिकारी, मुंबई,

सहजिल्हा निबंधक वर्ग-२ (निम्नश्रेणी) सातारा, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, धुळे, बीड, जालना, लातूर, परभणी, उस्मानाबाद, बुलढाणा, यवतमाळ, गडचिरोली, वर्धा, भंडारा, चंद्रपूर

शासकीय छायाचित्र नोंदणी कार्यालय, पुणे

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

वित्त विभाग (व्यय-१०)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई

सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

महासंचालक, माहिती व जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

ब-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

निवड नस्ती, म-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.